शासकीय जमिनींचा डेटा बँक करण्यासाठी तयार केलेल्या सॉफ्टवेअरमध्ये डेटा एन्ट्री करण्यासाठी नियुक्त केलेल्या डेटा मॅनेजमेंट असिस्टंटच्या पारिश्रमिकांची देयके अदा करणबाबत...

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन आदेश क्रमांक: संकीर्ण-२०१४/प्र.क्र.७५(अ)/ल-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ नोव्हेंबर, २०१५

प्रस्तावना:

शासकीय जमिन नोंदणी प्रणालीवर, शासनाने कब्जेहक्काने व भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या शासकीय जमीनींचा **डेटा** बँक तयार करण्यासाठी माहिती तंत्रज्ञान संचालनालय (सामान्य प्रशासन विभाग) यांच्या मान्यतेने मे. महाऑनलाईन लि. मुंबई यांच्याकडून आज्ञावली (सॉफ्टवेअर) विकसित करुन घेण्यात आली आहे. या आज्ञावली (सॉफ्टवेअर) मध्ये प्रदान केलेल्या शासकीय जमिनींची माहिती भरण्यासाठी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने ३ डेटा मॅनेजमेंट असिस्टंटच्या सेवा मे. महाऑनलाईन लि. मुंबई यांच्याकडून उपलब्ध करुन दिलेल्या होत्या. सदर ३ डेटा मॅनेजमेंट असिस्टंटना ३१ मार्च, २०१५ पर्यंत माहिती तंत्रज्ञान संचालनालयामार्फत पारिश्रमिक अदा करण्यात आले. तथापि, शिल्लक असलेले डेटा एन्ट्रीचे काम पूर्ण होणे आवश्यक असल्याने त्यांच्या सेवा विभागाने त्यांनंतरही ३० जून, २०१५ पर्यंत वापरात आणल्या आहेत. एप्रिल, २०१५ पासून सदर ३ डेटा मॅनेजमेंट असिस्टंटची पारिश्रमिकाची रु.९४,५००/-ची देयके महसूल व वन विभागाच्या तरतुदीतून अदा करण्याबाबत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने कळविले आहे. त्यानुसार ३ डेटा मॅनेजमेंट असिस्टंटच्या दिनांक ०१.०४.२०१५ ते दिनांक ३०.०६.२०१५ या कालावधीतील पारिश्रमिक अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे आदेश पारित करीत आहे.

शासन आदेश:-

नॅशनल इन्फॉरमेटीक सेंटर सर्व्हिसेस इं. (NICSI) यांच्या सन २०१४ मधील दरकराराप्रमाणे प्रति डेटा मॅनेजमेंट असिस्टंट दरमहा रु.१०,५००/- यानुसार ३ डेटा मॅनेजमेंट असिस्टंटचे एप्रिल, २०१५ ते जून, २०१५ या तीन महिन्यांकरीता रु.९४,५००/- (रुपये चौऱ्याण्णव हजार पाचशे मात्र) इतके पारिश्रमिक अदा करण्यास शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:विअप्र-२०१३/प्रक.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रसृत वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक २०-अ नुसार मुंबई वित्तीय नियम १९५९ संदर्भात नियम क्रमांक ७३ संदर्भातील अट क्र. ६ शिथिल करुन शासन मान्यता देत आहे.

२. उपरोक्त खर्च "मागणी क्र.सी-४, २०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा (००) ०९०, सचिवालय, (००)(०१) महसूल व वन विभाग (२०५२ ०२१२)" या लेखाशिर्षाअंतर्गत १३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टाखाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. अवर सचिव (रोख शाखा), महसूल व वन विभाग यांना या प्रयोजनाकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लिपमध्ये गौण/उपशीर्षाच्या संगणक संकेतांकांचा न चुकता उल्लेख करावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५०२/१५/विनियम, दि.३०.१०.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१५११०४१४५७१६३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2015.11.04 14:58:33 +05'30'

**(विलास थोरात)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
२) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
३) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई
७) सह सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव, रोख शाखा / ज-१ , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) कार्यासन ब-१ व ब-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती-ल-१